**उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय महाविद्यालये/संस्थांमधील शारिरीक शिक्षण संचालक पदाच्या सन २०१८ मधील बदल्यांबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०१८/(९५/१८)/मशि-१**
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १८ जून, २०१८.

**आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्य पार पडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(५) मध्ये विहीत केलेल्या तरतूदीस अनुसरुन उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय महाविद्यालये/संस्थांमधील शारिरीक शिक्षण संचालक यांच्या खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे परिणामस्वरूपत: (Resultant) बदल्या करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | शारिरीक शिक्षण संचालकाचे नाव | सध्या कार्यरत असलेले महाविद्यालये/संस्था | बदलीचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | डॉ. विशाखा सावजी | शासकीय विज्ञान महाविद्यालय, गडचिरोली | शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती | विनंती |

बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ होण्याकरीता संबंधित प्राचार्य/संचालकांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१. बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर बदली झालेल्या शारिरीक शिक्षण संचालकांच्या जागी पर्यायी शारिरीक शिक्षण संचालक हजर होण्याची वाट न पाहता संबंधित प्राचार्यांनी बदली झालेल्या शारिरीक शिक्षण संचालकांना बदलीच्या ठिकाणी रूजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे.
२. पदस्थापनेत बदल करण्यासंदर्भात कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणीही प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे शारिरीक शिक्षण संचालक शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.
३. बदली झालेल्या ठिकाणी रुजू होईपर्यंतच्या कालावधीत कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येणार नाही.
४. सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या शारिरीक शिक्षण संचालक यांच्या कार्यमुक्ततेच्या दिनाकांपर्यंत अथवा जास्तीत जास्त **दिनांक ३०.०६.२०१८** पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या महाविद्यालय/संस्थेने काढावे. त्यानंतरचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपूर्वीच्या महाविद्यालय/संस्थेकडून

काढण्यात येऊ नये, सदर वेतन संबंधित व्यक्ती बदलीच्या महाविद्यालय/संस्थेत रुजू झाल्यानंतर बदलीनंतरच्या महाविद्यालय/संस्थेने काढावे. **दिनांक ०१.०७.२०१८** पासूनचे वेतन बदलीपूर्वीच्या कार्यरत असलेल्या महाविद्यालय/संस्थेतून काढण्यात आल्यास त्या महाविद्यालय/संस्थेतील आंहरण व संवितरण अधिकारी यांना व्यक्तीश: जबाबदार धरण्यात येईल.

५. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेले शारिरीक शिक्षण संचालक कार्यमुक्त होऊन बदलीच्या ठिकाणी रुजू झाल्याबाबतचा अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी **दिनांक ०१.०७.२०१८** पूर्वी शासनास सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६१८१७३४५८८९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manisha Pravin Kini

Digitally signed by Manisha Pravin Kini
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=108cbdac08c7e940866a8fc97bfe7f861bf192ce9dd6b4d0924623149a51f9ed, cn=Manisha Pravin Kini
Date: 2018.06.18 17:40:03 +05'30'

**(म. प्र. किणी)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, नागपूर/अमरावती
३. प्राचार्य, शासकीय विज्ञान महाविद्यालय, गडचिरोली
४. संचालक, शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र -२, नागपूर
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. श्रीम. विशाखा सावजी, शारिरीक शिक्षण संचालक, शासकीय विज्ञान महाविद्यालय, गडचिरोली
८. निवड नस्ती.

**प्रत** :- १. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव